राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेच्या अंमलबजावणीबाबत
राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचे सभासदत्व संपुष्टात
आल्याने देय ठरणाऱ्या लाभांबाबत

## महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन परिपत्रक क्रमांक : अंनियो-२०१७ /प्र. क्र.२६/सेवा ४

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २८ जुलै, २०१७

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२०१५/ (NPS)/प्र. क्र.३२/सेवा ४,दिनांक ०६.०४.२०१५.**
२) **शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२००९ /प्र. क्र.०१/सेवा ४,दिनांक १२.१०.२०१०.**
३) **शासन निर्णय क्रमांकः अंनियो-२०१४ /प्र. क्र.४५/सेवा ४, दिनांक ०८.०५.२०१४.**
४) **निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांचेकडील अधिसूचना दिनांक ११.०५.२०१५.**

प्रस्तावना -

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/११/२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी केंद्र शासनाच्या धर्तीवर राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेच्या स्तर - १ ची अंमलबजावणी दिनांक ०१.०४.२०१५ पासुन करण्याची कार्यपध्दती विहित करण्यांत आली आहे.

**संदर्भ क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेतील सभासदांचे सदस्यत्व संपुष्टात आल्यावर परतावा देण्याबाबतची कार्यपध्दती विषद करण्यात आली आहे. सदरची कार्यपध्दती दिनांक ३१.०३.२०१५ पर्यंत योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आलेल्या प्रकरणांना लागु करण्यांत आली आहे. दिनांक ०१.०४.२०१५ पासुन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेची अंमलबजावणी सुरु झाल्यामुळे या दिनांकापासुनच सेवा समाप्त होणाऱ्या प्रकरणांना निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण (PFRDA) यांनी निर्गमित केलेल्या सूचनांप्रमाणे केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्या संकेतस्थळावरील सुविधांचा वापर करुन कर्मचारी, आहरण व संवितरण अधिकारी व कोषागार अधिकारी यांनी कार्यवाही करावयाची आहे.**

तथापि याबाबत संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये निर्देश देवुनही प्रत्यक्ष अंमलबजावणी मध्ये काही शंका आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून प्राप्त झाल्याने या प्रकरणी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

## शासन परिपत्रक -

**१) दि. ०१/०४/२०१५ नंतर राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेचे सभासदत्व संपुष्टात आल्याने देय ठरणाऱ्या लाभांबाबत (Exit and Withdrawal under NPS):-**

राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत सभासदांचे सदस्यत्व संपुष्टात आल्यानंतर अवलंबावयाची कार्यपध्दती, निवृत्तीवेतन निधी विनियामक व विकास प्राधिकरण यांच्या Exit and Withdrawal under NPS अधिनियम २०१५ मधील तरतुदीनुसार करण्यांत येते. त्यामध्ये प्रामुख्याने ३ पर्याय १) नियत वयोमानानुसार सेवासमाप्ती - (Superannuation) २) निधन - (Death) ३) मुदतपुर्व सेवा समाप्ती - (Pre-mature exit) उपलब्ध आहेत. त्याप्रमाणे संबधित कर्मचारी, आहरण व संवितरण अधिकारी व कोषागार अधिकारी यांना केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाच्या संकेतस्थळावर सुविधा उपलब्ध करुन दिल्या आहेत. त्याप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदरचे प्रस्ताव कोषागारात ऑनलाईन व मुळ प्रस्तावासह (Hard Copy) सादर करणे आवश्यक आहे. प्रस्ताव सादर करण्यापूर्वी आहरण व संवितरण अधिकारी यांनी कर्मचाऱ्याचे काही मिसींग क्रेडीट असल्यास त्या संबधीचे निराकरण कोषागारामार्फत करुन घेणे आवश्यक आहे. याशिवाय संबधित कर्मचाऱ्यांकडे कुठल्याही शासकीय रक्कमांचे येणे प्रलंबित नसल्याची, शासकीय मालमत्तेची त्याच्याकडून हानी झाल्यामुळे आर्थिक वसुली प्रलंबित नसल्याची, वेतन व भत्त्याचे अतिप्रदान वसुल करण्याचे प्रलंबित नसल्याचे तसेच स्तर-२ च्या रक्कमा स्तर-१ मध्ये वर्ग झाल्यामुळे नियोक्त्याच्या अंशदानाच्या अतिप्रदानाच्या रक्कमांबाबतची वसुली करणे प्रलंबित नसल्याची खात्री करावयाची आहे. तशा आशयाचे प्रमाणपत्र आहरण व संवितरण अधिकारी यांनी द्यावयाचे आहे. असे शासकीय येणे अप्राप्त असल्यास सदरच्या रक्कमांची वसूली नियोक्त्याच्या अंशदानातुन करणेबाबतची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी कोषागार अधिकारी यांचेकडे प्रस्तावित करावयाची आहे.

राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आल्यामुळे देय ठरणाऱ्या लाभांच्या प्रकरणी कोषागार अधिकारी यांनी प्रस्ताव प्राप्त झाल्यापासुन १५ दिवसाच्या आत पडताळणी करुन उचित कार्यवाही करावयाची आहे. मिसींग क्रेडीट, स्तर-२ चे स्तर-१ मध्ये झालेले चुकीचे वर्गीकरण याबाबत कोषागारातील अभिलेख्यांवरुन प्रत्यक्ष खात्री करुन पुढील कार्यवाही प्रस्तावित करावयाची आहे.

**अ) भविष्य निर्वाह निधी योजना लागू झालेल्या प्रकरणी परतावा देण्याबाबत :-**

दिनांक ०१.११.२००५ रोजी व त्यानंतर राज्य शासनात रुजू झालेल्या ज्या कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ च्या तरतुदी लागू ठरल्या आहेत, त्यानुसार त्यांच्या सक्षम प्राधिकाऱ्याने/ नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून आदेश काढून त्या कर्मचाऱ्यांना भविष्य निर्वाह निधी योजना लागू केली आहे. अशा प्रकरणी सदर कर्मचाऱ्यांना भविष्य निर्वाह निधी योजना लागू केल्याच्या दिनांकापर्यंत त्यांच्या डिसीपीएस/ एनपीएस योजने खालील वर्गणी कपात करण्यात आलेली असल्यास सदर अंशदानाचा परतावा देण्यात येतो. यामध्ये दिनांक १२.११.२०१० च्या शासन निर्णयान्वये दि.३१.०३.२०१५ पूर्वीच्या प्रकरणी राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयांमार्फत परतावा मंजूर करण्यांत येतो. दिनांक ०१.०४.२०१५ नंतरच्या प्रकरणी दिनांक ०६.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये सदरची कार्यवाही कोषागार स्तरावरच करणे अपेक्षित आहे. अशा

प्रकरणी कर्मचारी, आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडे त्यांच्या खात्यावरील जमा अंशदानाच्या परताव्याच्या मागणीबाबत अर्ज सादर करतील. आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबधित कर्मचाऱ्यास जुनी निवृत्ती वेतन योजना लागु झालेबाबतच्या नियुक्ती अधिकाऱ्याची स्वयंस्पष्ट आदेशाची प्रत व कर्मचाऱ्यांच्या खात्यावर दरमहा जमा झालेले कर्मचाऱ्यांचे अंशदान, नियोक्त्याचे अंशदान व त्यावरील मिळालेले व्याज याबाबतच्या तपशिलासह डिसीपीएस/ एनपीएस योजनेतील सभासदत्व संपुष्टात आणण्याचा व त्यातील रकमांच्या मागणीचा प्रस्ताव कोषागार अधिकारी यांचेकडे सादर करतील. कोषागार अधिकारी अशा जमा रक्कमांबाबत, कोषागारातील अभिलेखे व एनएसडीएलच्या संकेत स्थळावरील रकमेबाबत पडताळणी करतील. अशा प्रकरणात सभासदास शासनाचे अंशदान व त्यावरील व्याज अनुज्ञेय होत नसुन फक्त सभासदाचे स्वत:चे अंशदान व त्यावरील व्याज देय होते. अशा प्रकरणी केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांचेकडे सभासदाच्या प्रान क्रमांकावर जमा असलेला संचित निधी (Accumulated Fund) संबधित कोषागार अधिकारी यांनी ERM सुविधेव्दारे परत मागविणे आवश्यक आहे. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाने अशा प्रस्तावित केलेल्या ERM प्रस्तावाची छाननी करुन रक्कम परत मागविणेच्या प्रस्तावास मान्यता द्यावयाची आहे.

**कोषागार अधिकारी यांनी प्राप्त रक्कमांचे दोन समान भाग करावेत. प्रथम भाग मुख्य लेखाशिर्ष ८००९ राज्य भविष्य निर्वाह निधी, उपलेखाशिर्ष -०१, लघुशिर्ष-१०१, सामान्य भविष्य निर्वाह निधीमध्ये चलनाने जमा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी यांना रक्कम वर्ग करेल. तद्नंतर याबाबतचा संबधित कर्मचाऱ्याच्या भविष्य निर्वाह निधी खात्यात रक्कम जमा करणेबाबतचा प्रस्ताव आहरण व संवितरण अधिकारी महालेखापाल कार्यालयास सादर करेल. महालेखापाल कार्यालय जमा चलनाच्या आधारे संबधित कर्मचाऱ्याच्या खात्यावर रक्कम जमा करेल. कोषागार अधिकारी वरील रक्कमेचा दुसरा भाग राज्य शासनाच्या राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेतील नियोक्त्याच्या अंशदानाच्या संकेतांकाखाली शासन लेख्यामध्ये जमा करेल.**

**ब) दिनांक ०१/०४/२०१५ नंतर सभासदांचे सदस्यत्व संपुष्टात आल्यानंतर स्तर-२ च्या रक्कमा परत करणेबाबत :-**

शासन निर्णय दिनांक ०६/०४/२०१५ अन्वये परिच्छेद क्रमांक - ५२ नुसार दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंत सभासदत्व संपुष्टात आलेल्या सभासदांना राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून त्यांचे डीसीपीएस खात्यात जमा असलेल्या रक्कमेचा परतावा मंजुर करण्यांत येतो. त्यामध्ये सभासदाचे/ कर्मचाऱ्यांचे स्वत:चे अंशदान, सममूल्य शासनाचे अंशदान व त्यावर देय असलेले व्याज तसेच संबंधित कर्मचाऱ्याच्या डिसीपीएस खात्यावर वर्ग केलेले सहाव्या वेतन आयोगाचे फरकाचे हप्ते व त्यावर देय व्याज याप्रमाणे परिगणना करण्यात येऊन परतावा मंजुर करण्यात येतो.

शासन निर्णय दिनांक ०६/०४/२०१५ अन्वये परिच्छेद क्रमांक - ५३ नुसार दिनांक ०१/०४/२०१५ व त्यानंतर सेवा समाप्त झालेल्या सभासदांच्या प्रकरणांवर संबंधित कोषागारामार्फत मान्यता (authorization) दिल्यानंतर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडून कार्यवाही करण्यांत येते. राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेअंतर्गत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेमधील फक्त स्तर-१ च्या रक्कमा हस्तांतरीत केलेल्या

आहेत. त्यामुळे दिनांक ०१/०४/२०१५ पासुन राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेअंतर्गत सदस्यत्व संपुष्टात आलेल्या सभासदांना फक्त स्तर-१ मधील जमा रक्कमा परत करण्यांत येत आहेत. ज्या सभासदांचे दि.०१.०४.२०१५ नंतर योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आले आहे त्यांच्या डीसीपीएस खात्यात स्तर-२ च्या रक्कमा जमा असल्यास त्या रक्कमा परत करणे आवश्यक आहे यासाठी शासन निर्णय दिनांक १२.११.२०१० मधील विहित नमुन्यात कर्मचाऱ्याने आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडे अर्ज करावा, आहरण व संवितरण अधिकारी यांनी जमा रक्कम पडताळून सविस्तर तपशिल कोषागार कार्यालयाकडे पाठवावा. कोषागार कार्यालयाने चुकीचे वर्गीकरण व अतिप्रदान झाले नसल्याचे कोषागार अभिलेख्याशी पडताळणी करुन स्तर-२ च्या रक्कमांबाबत नमुना-ड आहरण व संवितरण अधिकारी यांना निर्गमित करतील. शासन निर्णय दि.१२.११.२०१० च्या तरतुदीप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयांस सदर रक्कमेच्या परताव्यासाठी प्रस्ताव सादर करतील. राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालय अशा प्रकरणी योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आल्याने स्तर २ मधील रक्कमांबाबत नमुना-ई निर्गमित करतील. सदरच्या रक्कमांचा स्थगन कालावधी (लॉकइन पिरियड) २०१९ पर्यंत असल्याने व नियमित सेवेत कार्यरत कर्मचाऱ्यांच्याबाबतीत स्तर-२ च्या रक्कमा परत करण्याची कार्यपध्दती शासनाकडून विहीत होईपर्यंत राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून दि.०१/०४/२०१५ नंतरच्या योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आलेल्या प्रकरणी कार्यवाही करण्यांत येईल.

**क) दिनांक ३१/०३/२०१५ पूर्वी सभासदत्व संपुष्टात आलेल्या सभासदांच्या एनएसडीएलकडे वर्ग झालेल्या रक्कमा ERM व्दारे प्राप्त करुन शासन जमा करणेबाबत :-**

शासन निर्णय दिनांक ०६/०४/२०१५ मधील परिच्छेद ५२ प्रमाणे दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेचे सभासदत्व संपुष्टात आलेल्या सभासदांना राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून परतावा दिला जातो. दि.०१/०४/२०१५ पासुन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेची अंमलबजावणी करतांना सेवार्थ प्रणालीतील सर्वच सभासदांची अशंदाने प्रान क्रमांक व रक्कमेच्या तपशिलासह राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणाकडे वर्ग करण्यांत आली आहेत. तथापि, यामध्ये आहरण व संवितरण अधिकारी यांचेकडून दिनांक ३१/०३/२०१५ पर्यंत सेवा समाप्ती झालेल्या सभासदांची सेवार्थ प्रणालीत सेवा समाप्त न केल्यामुळे वर्ग झालेली आहे.

कोषागार अधिकारी यांनी नमुना-ड निर्गमित करतेवेळी संबधित कर्मचाऱ्याचे मेसर्स एनएसडीएल/ केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांच्याकडे अंशदान जमा आहे किंवा नाही याबाबत खात्री करणे आवश्यक आहे. तसेच त्याबाबतचे अभिप्राय प्रान क्रमांक व रक्कमेच्या तपशिलासह नमुना-ड वर नोदंविणे आवश्यक आहे, असे प्रस्ताव आहरण व संवितरण अधिकारी यांच्याकडून राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडे प्राप्त झाल्यावर त्याची पडताळणी करुन संबधित कर्मचाऱ्यास राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून परतावा आदेश (नमुना-ई ) निर्गमित केला जाईल. परतावा आदेश निर्गमित करण्यापूर्वी, यापुर्वीच्या प्रकरणी म्हणजे (दि.३१.०३.२०१५ पूर्वीची प्रकरणे) राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालय केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाशी संपर्क साधुन आतापर्यंत मंजुर केलेल्या नमुना ई

प्रकरणी अथवा दि.३१.०३.२०१५ पुर्वीच्या योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आलेल्या इतर प्रकरणी आढावा घेवुन एकत्रितरित्या अशी रक्कम प्राप्त करणेबाबत कार्यवाही करेल. परंतु सदरच्या आदेशान्वये दि.०१.०४.२०१७ नंतर मात्र दि.३१.०३.२०१५ पूर्वीच्या सदस्यत्व संपुष्टात आल्या प्रकरणी संबंधित कर्मचाऱ्याची काही रक्कम एनएसडीएलकडे वर्ग झालेली असेल तर कोषागार कार्यालयाने आपल्या स्तरावर ERM व्दारे रक्कम मागवून घेऊन कोषागार लेख्यात अनुक्रमे कर्मचाऱ्याचे अंशदान, नियोक्त्याचे अंशदान व त्यावरील व्याज हे संबंधित लेख्याशिर्षाखाली जमा करण्याची कार्यवाही पूर्ण करुनच नमुना-ड निर्गमित करावा.

**ड) दिनांक ०१/०४/२०१५ नंतर योजनेचे सदस्यत्व संपुष्टात आले आहे. तथापि त्यांच्या मिसिंग क्रेडीटच्या रक्कमा मे.एनएसडीएल यांच्याकडे वर्ग झालेल्या नाहीत ही बाब परतावा मंजूर झाल्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी यांनी निदर्शनास आणल्यामुळे व ज्यांचे राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत दि.०१/०४/२०१५ नंतरही नोंदणी झालेली नाही व सदस्यत्व संपुष्टात आले आहे त्यांना परतावा देणेबाबत:-**

दिनांक ०१/०४/२०१५ नंतरच्या परतावा प्रकरणांबाबतीत कर्मचाऱ्यांने मिसिंग क्रेडीट असल्याबाबत खातर जमा न करता अंतिम परतावा प्रकरण आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे सादर केल्यामुळे, आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी सुध्दा अशा मिसिंग क्रेडीट रकमांची खातर जमा न करता अंतिम परताव्याबाबतचे प्रकरण कोषागारास पाठविल्यास, तसेच कोषागार कार्यालयाकडूनही मिसिंग क्रेडीटबाबतची खातर जमा न करता ऑनलाईन मान्यता दिल्यास सदर कर्मचाऱ्यास मिसिंग क्रेडीटच्या रक्कमा प्राप्त होऊ शकत नाही. कोषागार अधिकाऱ्यांनी परतावा प्रकरणे अंतिम करतांना कोणत्याही कर्मचाऱ्यांच्या मिसिंग क्रेडीटच्या रकमा अंर्तभूत करावयाच्या राहणार नाही याबाबत गांभीर्याने दक्षता घ्यावी. परतावा प्रकरणे अंतिम झाल्यानंतर मिसिंग क्रेडीट असल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित कोषागार अधिकारी जबाबदार राहतील.

सद्यस्थितीत मात्र सदरच्या रक्कमांची मागणी कर्मचाऱ्यांकडून होत आहे. त्यामुळे अशा प्रकरणी या रकमांची, हे शासन परिपत्रक निर्गमित होण्यापूर्वीच्या सर्व प्रकरणी शासन निर्णय दि.१२/११/२०१० मधील तरतूदींप्रमाणे रक्कमा देय करणे आवश्यक ठरेल. तसेच आज मितीस दि.०१/०४/२०१५ नंतरचे जे सभासद राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेचे सभासद होऊ शकले नाहीत व त्यांचे योजनेचे सभासदत्व संपुष्टात आले आहे, त्यानांही रकमेचा परतावा शासन निर्णय दिनांक १२/११/२०१० मधील तरतूदीप्रमाणे देय राहील.

**२) नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होणाऱ्या सभासदांचे सेवानिवृत्ती दिनांकापूर्वी लगतच्या ३ महिन्यात अंशदाने जमा न करणेबाबत:-**

नियत वयोमानानुसार सेवासमाप्ती होणाऱ्या सभासदांचे दावे (claim) सेवानिवृत्तीचे दिनांकापूर्वी ६ महिने अगोदर केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणामार्फत प्रणालीव्दारे संस्करित होतात. Exit and withdrawal under NPS अधिनियम २०१५ मधील नियम ३७ अन्वये सेवासमाप्तीच्या दिनांकापूर्वी ३ महिने अगोदर कोणतेही अंशदान सभासदाचे एनपीएस खात्यात जमा करु नयेत अशी तरतुद केलेली आहे. त्यानुसार केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरण यांचे प्रणालीमध्येही सेवा समाप्तीच्या दिनांकापूर्वी ३ महिने नियमित अंशदाने म्हणून स्विकारली जात नाहीत. सद्यस्थितीत खालीलप्रमाणे अंशदानाचे प्रकार

स्विकारण्यासाठी सुविधा केंद्रीय अभिलेख देखभाल अभिकरणामार्फत (CRA) उपलब्ध करण्यांत आली आहे.

| **अंशदानाचा प्रकार (Contribution Type)** | **सेवानिवृत्ती पूर्वी ९० दिवसाचा अवधी शिल्लक असल्यास (Date of Retirement is future dated i.e. No. of days between date of retirement and date of upload (Business date) is greater than 90 days)** | **फाईल अपलोड करण्याचा कालावधी ९० दिवसातील असल्यास (Date of Retirement is within 90 days from date of (Business date) upload )** | **सेवानिवृत्ती दिनांक मुदत पुर्तीनंतर (Date of retirement is Completed/ passed)** |
|---|---|---|---|
| नियमित (Regular) | फाईल अपलोड होईल (Accepted) | फाईल अपलोड होणार नाही (Rejected) | फाईल अपलोड होणार नाही (Rejected) |
| थकबाकी (Arrear) | फाईल अपलोड होईल (Accepted) | फाईल अपलोड होईल (Accepted) | फाईल अपलोड होईल (Accepted) |

सर्व आहरण व संवितरण अधिकारी यांनी राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होणाऱ्या सभासदांची सेवानिवृत्ती दिनांकापूर्वी लगतच्या ३ महिन्यात अंशदाने कपात करु नयेत व कोषागार अधिकारी यांनीही देयक पारित करीत असतांना याची दक्षता घ्यावी. यथावकाश या नियमानुसार सेवार्थ प्रणालीत आवश्यक ते बदल करण्यांत येतील.

**३) <u>ताळमेळाबाबत:-</u>**

शासन निर्णय दि.१२/११/२०१० मधील तरतुदीनूसार कोषागारांनी दिलेल्या नमुना-ड प्रमाणे परतावा आदेश (नमुना-ई) राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून निर्गमित होत आहेत. तसेच नमुना-ई संबंधिचे अनुदान राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयाकडून संबधित कार्यालयांना देण्यांत येत आहे. कोषागार अधिकारी हे उपराज्य अभिलेख देखभाल अधिकारी असल्याने व अंतिम परतावा रक्कमेचे प्रदान कोषागारामार्फतच होत असल्याने, सदरच्या मुख्य लेखा शिर्ष ८३४२००८८ अंतर्गत खर्च पडलेल्या रक्कमांचा ताळमेळही कोषागारांनी पूर्ण करुन राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयास त्रैमासिक अहवाल सादर करावयाचा आहे. कोषागारात उपदान नोंदवहीप्रमाणेच नमुना-ई नोंदवही परिरक्षित करावयाची असून, खर्ची पडलेल्या प्रमाणकांबाबत दरमहा विभागीय सहसंचालक लेखा व कोषागारे कार्यालयामार्फत राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयांस अहवाल सादर करावयाचा आहे. प्रलंबित नमुना-ई प्रकरणी, आहरण व संवितरण अधिकारी यांच्याकडे पाठपुरावा करुन प्रकरण प्रलंबित राहण्याची कारणे राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयास कळवायाचे आहेत ज्या अन्वये राज्य अभिलेख देखभाल अभिकरण कार्यालयास ८३४२००८८ अंतर्गत ताळमेळ पूर्ण करता येऊ शकेल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०७२८१२३११३९००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2017.07.28 16:42:58 +05'30'

**अनुदीप दिघे**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१००० प्रती),

२) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर(१००० प्रती),

३) महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),

४) महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५प्रती),

५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),

६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),

७) संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती)

८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),

९) उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),

१०) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),

११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),

१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),

१३) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई

१४) राज्यपालांचे सचिव,

१५) मुख्य मंत्र्यांचे सचिव,

१६) सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

१७) *विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

१८) *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,

१९) *प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,

२०) *सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२१) *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२२) *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

२३) *प्रबंधक, मुंबई महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण /नागपूर/औरंगाबाद

२४) मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र, मुंबई.

२५) आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)

२६) सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२

२७) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग,गृहनिर्माण भवन (म्हाडा बिल्डींग), पोट माळा, वांद्रे पूर्व, मुंबई ४०० ०५१.

२८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२.

२९) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र पेन्शनर्स असोसिएशन, १४४९, सदाशिव पेठ, 'संकल्प खजिना महाल बोळ, एस.पी.कॉलेज समोर, पुणे ४११ ०३०

३०) कार्यवाह, बृहन्मुंबई पेन्शनर्स असोसिएशन, वर्ग क्र.२१, तळ मजला, छबिलदास हायस्कूल, वनमाळी हॉलसमोर, दादर (प), मुंबई-४०० ०२८.

३१) अध्यक्ष, महाराष्ट्र स्टेट गव्हर्नमेंट पेंशनर्स असोसिएशन बेळगाव, १०९१, अनंतशयन गल्ली, लक्ष्मी निवास, दुसरा मजला, बेळगांव.

३२) मंत्रालयातील सर्व विभाग,

३३) मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

३४) सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

३५) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३६) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष

३७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

३८) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

३९) तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

४०) सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

४१) संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),

४२) सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४३) सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

४४) कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

४५) कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

४६) कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

४७) कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

४८) कुल सचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),

४९) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),

५०) कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर (५ प्रती),

५१) बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)

५२) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट , मुंबई २० (५ प्रती)

५३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ ( ५ प्रती)

५४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५प्रती )

५५) इंडियन नॅशनल कॉँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती )

५६) नॅशनलिस्ट कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ ( ५ प्रती )

५७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)

५८) वित्त विभागातील सर्व कार्यासने,

५९) निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

*पत्राद्वारे.